**अस्थायी पदांना दि. १.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देणेबाबत.**

परभणी न्यायीक जिल्ह्यातील जिल्हा व सत्र न्यायालय आणि दुय्यम न्यायालये

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: अस्थायी-२०२५/प्र.क्र.४७/कार्या-१२**

पाचवा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:- २० मार्च, २०२५.

वाचा -

(१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. अस्थायी-२०२४/प्र.क्र.६३/कार्या-१२ दिनांक २६.०९.२०२४

(२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि- २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.

(३) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, अमरावती यांचे पत्र जा. क्र. आस्था/ब-४/१८५७/२०२५,दि. ०६.०२.२०२५.

प्रस्तावना :-

वाचा येथील संदर्भ १ अन्वये परभणी न्यायीक जिल्ह्यातील जिल्हा व सत्र न्यायालय व दुय्यम न्यायालयांच्या आस्थापनेवरील १४० अस्थायी पदांना दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भ २ अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार दिलेले आहेत. यास अनुसरुन परभणी न्यायीक जिल्ह्यातील जिल्हा व सत्र न्यायालय व दुय्यम न्यायालयांच्या आस्थापनेवरील १४० अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची विनंती प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी यांनी संदर्भ ३ अन्वये केली आहे. त्यानुषंगाने सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

परभणी न्यायीक जिल्ह्यातील जिल्हा व सत्र न्यायालय व दुय्यम न्यायालयांच्या आस्थापनेवरील निम्नलिखित १४० अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र | पदनाम | दि. २८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ मिळालेली एकूण पदे | दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | अधिक्षक | ०२ | ०२ |
| २ | सहायक अधिक्षक | १० | १० |
| ३ | लघुलेखक उच्च श्रेणी | ०२ | ०२ |
| ४ | लघुलेखक निम्न श्रेणी | १५ | १५ |
| ५ | वरिष्ठ लिपिक | २४ | २४ |
| ६ | कनिष्ठ लिपिक | २४ | २४ |
| ७ | लघु टंकलेखक | ०२ | ०२ |
| ८ | मुख्य बेलिफ | ०२ | ०२ |
| ९ | बेलिफ | १९ | १९ |
| १० | वाहनचालक | ०१ | ०१ |
| ११ | सफाईगार | ०१ | ०१ |
| १२ | कंत्राटी सफाईगार | ०६ | ०६ |
| १३ | पहारेकरी | ०१ | ०१ |
| १४ | कंत्राटी पहारेकरी | ०७ | ०७ |
| १५ | मेहेतर | ०१ | ०१ |
| १६ | पुस्तक बांधणीकार | ०३ | ०३ |
| १७ | शिपाई | २० | २० |
| | एकूण | **१४०** | **१४०** |

२. यासाठी येणारा खर्च "२०१४-न्यायदान" या मुख्य लेखाशीर्षाखाली १०५ (दोन) जिल्हा व सत्र न्यायाधिश, “१०५ (तीन) दिवाणी न्यायाधिश” व “१०८ फौजदारी न्यायालये” यापैकी योग्य त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखालील सन २०२५-२०२६ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ नुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-तीन मधील अ.क्र. ४ चा परिच्छेद क्र. २७ (२) मधील 'क'

येथील वित्तीय शक्तीनुसार तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय कमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/ १६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०१६३७३८४५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL SHESHRAO AKHARE

Digitally signed by SUNIL SHESHRAO AKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=c55b6c504707142ddacf2e4222bba5fd769f8fabe09cfab3a389b22d9d2e954c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=864BAFED115354AB0BA4922472430458850E886F58FCE5E92AF39B897208763E, cn=SUNIL SHESHRAO AKHARE
Date: 2025.03.20 16:38:36 +05'30'

**(सुनिल आखरे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
२. प्रबंधक, निरीक्षणे-१, मा. उच्च न्यायालय, मुंबई
३. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर, औरंगाबाद .
४. महालेखापाल -(लेखा व अनुज्ञेयता)- एक, महाराष्ट्र मुंबई
५. महालेखापाल -(लेखापरीक्षा )-एक, महाराष्ट्र मुंबई
६. महालेखापाल -(लेखा व अनुज्ञेयता)- दोन, महाराष्ट्र नागपूर
७. महालेखापाल -(लेखापरीक्षा )- दोन, महाराष्ट्र नागपूर
८. सह सचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर, छत्रपती संभाजीनगर
९. वित्त विभाग/आ.पु.क., व्यय-५, ( अर्थसंकल्प-११) मंत्रालय, मुंबई.
१०. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी
११. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
१२. उप कोषागार अधिकारी, परभणी
१३. विधि व न्याय विभाग, कार्यासन ११, २३ व २४.
१४. निवड नस्ती.